2011031911211700१

पुणे महानगरपालिका

विशेष कार्याधिकारी [विद्युत] या अभिनामाचे पद हंगामी स्वरूपात निर्माण करण्यास शासन मान्यता देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक:पीएमसी-३०९३/१५७८/प्र.क्र. २१०/नवि. २२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक १४ नोव्हेंबर १९९४.

वाचा :- १]आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांचे क्र. मआ/सआ/से/१६९७, दिनांक १९. १०. १९९३ चे पत्र.

२]महापालिका सहाय्यक आयुक्त[जनरल]पुणे महानगरपालिका, पुणे यांचे क्र. सआ/से/१६७९, दि. १३. ९. ९४ चे पत्र,

शासन निर्णय:- मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ५१[४] अन्वये प्रदान केलेल्या अधिकारानुसार पुणे महानगरपालिकेच्या स्थापत्य विभागाकरिता "विशेष कार्याधिकारी [विद्युत]" वेतनश्रेणी रू. ४२००-१६०-५०००-१८०-६६२० या अभिनामाचे एक पद नेमणूक दिनांकापासून दोन वर्षांच्या [दि. ६. ९. ९३ ते दि. ५. ९. ९५] कालावधीसाठी हंगामी स्वरूपात निर्माण करण्याच्या पुणे महापालिकेच्या प्रस्तावास, शासन याव्दारे मंजूरी देत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[रु. कृ. पाटील]
कक्ष अधिकारी

प्रति,
आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे[५ प्रती]
निवड नस्ती; नवि. २२.

नां. ७११